अमरावती येथे फिशरीज हब स्थापन करण्याच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
कृषि, पशुसंवर्धन ,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
शासन निर्णय क्रमांक : मत्स्यआ-२०१५/प्र.क्र.१९४ /पदुम-१२
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १७ ऑक्टोबर, २०१८.

वाचा : १. नगर विकास विभाग शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.१७१/(२१)/नवि-१६ दिनांक २८.३.२०१७

२. कृषि, पशुसंवर्धन ,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग पत्र क्र.मत्स्य-२०१५/ सीआर-१९४/पदुम-१२ दिनांक २३.३.२०१६.

३. केंद्र शासनाचे पत्र क्र.३१०३/०३/२०१७ Fy (P & M ), दि.२८/९/२०१७.

प्रस्तावना -:

अमरावती महानगरपालिकेने अमरावती येथे आधुनिक फिशरी हब तयार करण्याची महाराष्ट्र राज्य मत्स्योद्योग विकास महामंडळास केलेल्या विनंतीनुसार शासनाच्या दिनांक १९/९/२०१५ च्या आदेशान्वये महाराष्ट्र मत्स्योद्योग विकास महामंडळास नोडल एजन्सी म्हणून मान्यता देण्यात आली व त्यानुसार अमरावती महानगरपालिका व महाराष्ट्र मत्स्योद्योग विकास महामंडळ यांच्यामध्ये दिनांक १/१/२०१६ रोजी करार करण्यात आला. त्याअनुषंगाने महामंडळाने अमरावती फिशरी हबचा रु.३८.८५ कोटीचा प्रकल्प अहवाल तयार केला होता त्यामध्ये अत्याधुनिक फिश मार्केट, फिश प्रोसेसिंग युनिट , होलसेल फिश मार्केट ,कोल्ड स्टोरेज व प्रशासकीय इमारत व स्थानिक स्तरावर मत्स्य विक्री मत्स्योत्पादन व निर्मितीकरीता आवश्यक सर्व पायाभूत सुविधांचा समावेश करण्यात आला आहे. या प्रकल्पामुळे अमरावती विभागातील गोडया पाण्यातील मासेमारी करणाऱ्या १.५० लक्ष मासेमारांना रोजगार मिळणे अपेक्षित आहे .हा प्रकल्प केंद्र व राज्य शासनाच्या संयुक्त सहभागातून राबवायचा असून यामध्ये केंद्र शासनाचा ६०टक्के व राज्य शासनाचा ४० टक्के याप्रमाणार हिस्सा राहणार आहे.

नगरविकास विभागाने महानगरपालिका क्षेत्रात मुलभूत सोयी सुविधांच्या विकासासाठी विशेष तरतूद या योजनेंतर्गत अमरावती महानगर पालिका क्षेत्रातील फिशरीज हब प्रकल्पाकरीता रु.२० कोटी इतका निधी मंजूर करण्यात आला आहे. सदरचा निधी संचालक ,नगर परिषद प्रशासन संचालनालय , वरळी ,मुंबई यांच्याकडे सुपुर्द करण्यात आला आहे.

केंद्र शासनाच्या नीलक्रांती योजनेंतर्गत बदललेल्या धोरणानुसार उपरोक्त संदर्भ क्र.३ अन्वये केंद्राने सदर योजनेतील फक्त रु.४.५५ कोटीचा प्रकल्प मंजूर केला. केंद्र शासनाने मंजूर केलेल्या प्रकल्पासाठी रु.४.५५ कोटीची विगतवारी पुढीलप्रमाणे आहे:-

| अ.क्र. | विगतवारी | निधी (रु.लाखात) |
|---|---|---|
| १. | केंद्र हिस्सा | रु.१०९.२० (२४ %) |
| २. | राज्य हिस्सा | रु. ७२.८० (१६%) |
| ३. | लाभार्थी हिस्सा | रु.२७३.०० (६०%) |
| | एकूण | रु.४५५.०० |

तदनंतर महाराष्ट्र मत्स्योद्योग विकास महामंडळाने रु.२१.८२ कोटी रक्कमेचा सुधारीत प्रकल्प अहवाल सादर केला आहे. त्याबाबतचा तपशील खालीलप्रमाणे आहे :-

| अ.क्र. | बाब | आवश्यक निधी (रु.कोटीत) |
|---|---|---|
| १. | बडनेरा येथे फिशरीज हब | रु.१७.२७ |
| २. | पारडी येथे घाऊक व किरकोळ मत्स्यबाजार | रु. ४.०० |
| ३. | बडनेरा येथे लहान व किरकोळ बाजार मत्स्यबाजारपेठ | रु.०.५५ |
| | एकूण | रु.२१.८२ |

नगरविकास विभागाने महानगरपालिका क्षेत्रात मुलभूत सोयी सुविधांच्या विकासासाठी विशेष तरतूद या योजनेंतर्गत अमरावती महानगर पालिका क्षेत्रातील फिशरीज हब प्रकल्पाकरीता रु.२० कोटी इतका निधी मंजूर करुन वितरीत केलेला आहे. सदर रु.२० कोटी निधीपैकी लाभार्थी हिस्सा म्हणून रु.२.७३ कोटी इतक्या रक्कमेस नियोजन व वित्त विभागाने मान्यता दिली. त्यामुळे या प्रकल्पासाठी एकूण रु.२१.८२ कोटीच्या निधीची उपलब्धता पुढीलप्रमाणे होणार आहे :-

१. केंद्र हिस्सा : रु.१०९.२० कोटी (२४%)
२. राज्य हिस्सा : रु. ७२.८० कोटी (१६%)
३. लाभार्थी हिस्सा : रु. २.७३ कोटी (नगर विकास विभागाच्या रु.२० कोटीमध्ये अंतर्भुत)
४. राज्य शासन नगर विकास विभाग : रु. १७.२७ कोटी

--------------

एकूण : रु.२१.८२ कोटी

अमरावती येथे किरकोळ व घाऊक बाजारपेठेतील अमरावती फिशरीज हब या रु.२१.८२ कोटीच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

अमरावती बडनेरा येथे फिशरीज हब तयार करण्याच्या कामामध्ये अंतर्भुत असलेल्या खालील १२ कामांचा समावेश आहे.

| अ.क्र. | बाब | किंमत (रु.लक्ष) |
|---|---|---|
| १. | घाऊक व किरकोळ बाजारपेठ अंतर्गत ३० घाऊक स्टॉल व १० रिटेल स्टॉल, चिल्ड रुम व आईस स्टोरेज | ४४८.२० |
| २. | आईस युनीट २० टन प्रतिदिन क्षमतेचे | १४२.२५ |
| ३. | फिश ड्रेसिंग सेंटर | ३९५.६७ |
| ४. | विद्युत पुरवठा | ६०.०० |

| | | |
|---|---|---|
| ५. | ई.टी.पी. | ४५.०० |
| ६. | कँटीन/रेस्टॉरंट, बँक ए.टी.एम., रेस्टरुम इ. | ९५.०० |
| ७. | स्वछतागृह | २५.०० |
| ८. | कंपाऊंड वॉल, पाण्याची टाकी, अंतर्गत रस्ते, sump tank, केबल, सुरक्षा व सी.सी.टी.व्ही. | २६०.०० |
| ९. | थर्ड पार्टी ऑडीट, contingency, work establishment charges, unforeseen expenses | ९९.०० |
| १०. | पारडी येथे घाऊक व किरकोळ मत्स्यबाजार | ४.०० |
| ११. | बडनेरा येथे लहान व किरकोळ मत्स्यबाजार पेठ | ०.५५ |
| १२. | Administrative and consultancy charges payable to MFDC | १५६.०० |
| | एकूण | २१८२.०० |

उपरोक्त अमरावती येथील फिशरीज हब अंतर्गत घ्यावयाच्या १२ कामांच्या एकूण रु.२१.८२ कोटीच्या रक्कमेस प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

सदर प्रकल्प कार्यान्वित करण्याकरीता महाराष्ट्र मत्स्योद्योग विकास महामंडळास नोडल एजन्सी म्हणून मान्यता देण्यात आली आहे. महामंडळाने प्रादेशिक उपायुक्त मत्स्यव्यवसाय, अमरावती यांच्यामार्फत सदर प्रकल्पाचे काम विहीत वेळेत व नियोजित आराखडयानुसार चालू आहे याबाबत आढावा घेवून त्याचा अहवाल शासनास वेळोवेळी सादर करावा. सदर निधीबाबतचे लेखे ठेवणे तसेच केंद्र हिस्स्याचा निधी खर्च झाल्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनाच्या मान्यतेने केंद्र शासनास पाठविणे ही बाब महाराष्ट्र मत्स्यद्योग विकास महामंडळ, मुंबई यांनी करावी.

सदर प्रकल्प कार्यान्वित करणे व कार्यान्वित झाल्यानंतर त्याचे नियंत्रण व देखभाल अमरावती महानगरपालिका करेल.

हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक २३२/१४३२ दिनांक ३०.१.२०१८ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ५०८ दिनांक ६.१०.२०१८ अन्वये त्यांनी दिलेल्या मान्यतेच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहेत.

सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०१८१०१७१५३३१०८८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anoop Kumar

Digitally signed by Anoop Kumar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=257f78acf3ca20d9e91d7a73a76aa0240463e4aafdd4d13de68918dc20bad8e6, serialNumber=1c2ee608849bdb812849b6c8878f95607059b530ff717c8e39c09d06b394e02b, cn=Anoop Kumar
Date: 2018.10.17 15:39:09 +05'30'

**(अनूप कुमार)**

प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव ,मंत्रालय ,मुंबई.

२. मा.मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव ,मंत्रालय ,मुंबई.
३. मा.राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव ,मंत्रालय ,मुंबई.
४. मा.मुख्य सचिव यांचे खाजगी सचिव ,मंत्रालय,मुंबई.
५. महालेखापाल, (लेखापरिक्षा /लेखा व अनुज्ञेयता) मुंबई /नागपूर.
६. अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई
७. अपर मुख्य सचिव (नियोजन) ,मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव (पदुम), मंत्रालय, मुंबई.
९. आयुक्त, अमरावती महानगरपालिका, अमरावती.
१०. आयुक्त, मत्स्यव्यवसाय आयुक्तालय ,मुंबई.
११. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र मत्स्योद्योग विकास महामंडळ ,मर्या ,.मुंबई.
१२. प्रादेशिक उपायुक्त मत्स्यव्यवसाय, अमरावती.
१३. सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय, अमरावती.
१४. निवडनस्ती, पदुम-१२ .